**महाराष्ट्र शासन**

क्र.प्रतिनि-२०१९/प्र.क्र.२३ /का-१४
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- ०७ .०२.२०१९

**प्रति,**

सह सचिव/उप सचिव, (आस्था)
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

**विषय- अवर सचिव संवर्गातून प्रतिनियुक्तीने पद भरण्याबाबत -**
निवासी आयुक्त कार्यालयाच्या आस्थापनेवरील सहायक निवासी आयुक्त (संपर्क) हे पद प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत

महोदय/महोदया,

**निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली यांच्या आस्थापनेवरील सहायक निवासी आयुक्त (संपर्क)** हे पद मंत्रालयीन अवर सचिव संवर्गातून प्रतिनियुक्तीने भरावयाचे आहे. यासाठी मंत्रालयीन विभागातील **अवर सचिव संवर्गातील** अधिकाऱ्यांकडून **दि.२८.०२.२०१९ पर्यंत** इच्छुकता मागविण्यात येत आहेत.

०२. आपल्या विभागातील सर्व अवर सचिवांना सदर प्रतिनियुक्तीबाबत अवगत करावे. इच्छुक अवर सचिवांचे मागील तीन वर्षांचे गोपनीय अहवाल (छायांकित प्रती) व पत्रासोबत जोडलेल्या विवरण पत्रामधील वैयक्तिक माहिती या विभागाकडे तात्काळ पाठवावी, ही विनंती. तसेच इच्छुक अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्तीसाठी निवड झाल्यास त्यांना संबंधित विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे याबाबतही कृपया अभिप्राय द्यावेत.

०३. सदर शासन पत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९०२०७१७२०५४४८०७ असा आहे. हे पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आले आहे.

आपला विश्वासू,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: CN = Gajanan Bhimrao Gurav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = General Administration Department
Date: 2019.02.07 17:23:52 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

सोबत-

विवरणपत्र तसेच स्व-परिचय पत्र

**प्रत** - सहायक निवासी आयुक्त (प्रशासन), निवासी आयुक्त यांचे कार्यालय, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस मार्ग, नवी दिल्ली - यांना त्यांचे पत्र क्र.निआ/आस्था/५८-III/२०१९/६२५१ दि.२२/०१/२०१९ च्या अनुषंगाने माहितीसाठी सादर

## विवरणपत्र

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>मुद्दा</th><th>तपशिल/अभिप्राय</th></tr>
<tr><td>१</td><td>अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे संपूर्ण नाव</td><td></td></tr>
<tr><td>२</td><td>जन्मदिनांक</td><td></td></tr>
<tr><td>३</td><td>शैक्षणिक अर्हता</td><td></td></tr>
<tr><td>४</td><td>भ्रमणध्वनी क्रमांक</td><td></td></tr>
<tr><td>५</td><td>मागील ३ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत.)</td><td></td></tr>
<tr><td>६</td><td>मत्ता व दायित्वे सादर केली आहेत का?</td><td></td></tr>
<tr><td>७</td><td>५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास)</td><td></td></tr>
<tr><td>८</td><td>संबंधित अधिकाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद व कालावधी) (प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षापेक्षा जास्त नसावा)</td><td><table>
<tr><td>दिनांकापासून ते दिनांकापर्यंत</td><td rowspan="3">पद /प्रतिनियुक्तीचे ठिकाण</td></tr>
<tr><td></td></tr>
<tr><td></td></tr>
<tr><td colspan="2">एकूण कालावधी</td></tr>
</table></td></tr>
<tr><td>९</td><td>मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ५ वर्षे पूर्ण झाली आहेत का?</td><td></td></tr>
<tr><td>१०</td><td>संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय चौकशी सुरू अथवा प्रस्तावित आहे काय?</td><td></td></tr>
<tr><td>११</td><td>प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे.</td><td></td></tr>
</table>

क्र.नि.आ. (आस्था) (१४.७)
२५/१/१९

# महाराष्ट्र शासन

क्र.निआ/आस्था/५८-III/२०१९/6251

निवासी आयुक्त यांचे कार्यालय,
महाराष्ट्र सदन, कोपर्निकस मार्ग,
नवी दिल्ली - ११०००१.
दिनांक :

प्रति,

उप सचिव (सेवा),
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.

**विषय: सहाय्यक निवासी आयुक्त (संपर्क) [वेतनबँड रु. १५६००-३९१०० + ग्रेड वेतन रु. ६६००/-] या पदावर इच्छुक अधिकारी यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करणेबाबत.**

संदर्भांकित विषयास अनुसरुन आपणांस कळविण्यात येते की, सहाय्यक निवासी आयुक्त (संपर्क) या पदावर कार्यरत असलेले श्री. राजीव मल्लिक यांची त्यांच्या मुळ विभागात उप सचिव पदावर पदोन्नती झाल्यामुळे त्यांना पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याकरिता कार्यालयीन आदेश क्र. RC/Estt./114(1)/2019/6206, दि. १४.०१.२०१९ अन्वये दि. १४.०१.२०१९ (मध्यान्होत्तर) रोजी पासून कार्यमुक्त करण्यात आल्यामुळे सदरील पद दि. १५.०१.२०१९ पासून रिक्त आहे.

२. शासन निर्णय क्र. पदनि २०१२/११६/३१, दि. २४.०४.२०१२ नुसार निवासी आयुक्त कार्यालयाच्या आस्थापनेवरील सहाय्यक निवासी आयुक्त (संपर्क) {वेतनबँड रु. १५६००-३९१०० + ग्रेड वेतन रु. ६६००/-} या पदावर मंत्रालयीन अवर सचिव पदावरील अथवा राज्य व केंद्र शासनातील तत्सम दर्जाच्या अधिकाऱ्यामार्फत प्रतिनियुक्तीने भरण्याची तरतुद आहे.

३ सध्या निवासी आयुक्त कार्यालयाच्या आस्थापेनवरील सहाय्यक निवासी आयुक्त (संपर्क) हे पद रिक्त असून सदरील पद लवकरात लवकर प्रतिनियुक्तीने भरणे आवश्यक आहे. त्यामुळे सदर पदावर मंत्रालयातील अवर सचिव पदावर कार्यरत असलेले अधिकारी तसेच वेतनबँड रु. १५६००-३९१०० + ग्रेड वेतन रु. ६६००/- मध्ये कार्यरत असलेल्या अधिकाऱ्यांची सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्यामार्फत इच्छुकता मागवून सहाय्यक निवासी आयुक्त (संपर्क) या पदावर योग्य अधिकारी यांना प्रतिनियुक्तीने पदस्थापित करावे, ही विनंती. सोबत स्व-परिचय पत्राचा नमुना जोडण्यात आलेला आहे.

(सुमन चंद्रा, भा.प्र.से.)
सहाय्यक निवासी आयुक्त (प्रशासन)

सोबत : वरीलप्रमाणे.

सा. प्र. वि. ... कार्या २९
... दिनांक: 25/1/19
... पोस्ट ...

# स्व-परिचय पत्र

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 1 | नाव | : | | | |
| 2 | जन्मदिनांक | : | | | |
| 3 | सेवा | : | | | |
| 4 | बॅच | : | | | |
| | | | | | |
| 5 | संपर्क दूरध्वनी क्रमांक | | (कार्यालय) | (निवास) | (भ्रमणध्वनी) |
| | | | | | |
| 6 | शैक्षणिक पात्रता | : | | | |
| | | | | | |
| 7 | पूर्ण अनुभव/पदस्थापनेची माहिती : | | | | |

| अ. क्र. | कालावधी | पदनाम/ कार्यालय | संवर्ग पद/ प्रतिनियुक्तीचे पद | पदस्थापनेचे पद | कामासंदर्भातील विस्तृत तपशिल |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |

| | | | |
|---|---|---|---|
| 8 | Vigilance Clearance | : | |
| 9 | अधिकारी पूर्वी प्रतिनियुक्तीवर पदस्थापित होते का? असल्यास, प्रतिनियुक्तीवरील कार्यालय, प्रतिनियुक्तीचे स्वरुप व कालावधी (तारखा) इत्यादीबाबत माहिती पुरविण्यात यावी | : | |

10. प्रमाणित करण्यात येते की उपरोक्त माहिती अचूक आणि परिपूर्ण आहे.

अर्जदाराची सही

दिनांक: . . . . . . . . . . . .

सही

वरील तपशिल प्रमाणित करणाऱ्या

अधिकाऱ्याचे नाव/पदनाम आणि रबरी ठसा

टीप:

स्तंभ १-७ मधील माहिती अर्जदाराने भरावयाची आहे.

स्तंभ ८-९ मधील माहिती संवर्ग नियंत्रक प्राधिकाऱ्याने भरावयाची आहे.